**जिल्हा न्यायाधीश-१ व अतिरिक्त सत्र न्यायाधीश, वडगाव मावळ, जिल्हा पुणे यांना मोटार अपघात दावा प्रकरणांच्या प्रयोजनासाठी यांना "कार्यालय प्रमुख" आणि "आहरण व संवितरण अधिकारी" म्हणून घोषित करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक एमसीटी-०७२२/प्र.क्र.१८८/परिवहन-५**
मादाम कामारोड, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : ०७ ऑगस्ट, २०२४.

**वाचा :** १) जिल्हा न्यायाधीश-१ व अतिरिक्त सत्र न्यायाधीश, वडगाव मावळ यांचे पत्र क्र. म.जा.क्र.प्रशा.ब-४/४९९३/सन २०२२, दि.२२/०८/२०२२ व दि.२९/०६/२०२४.

२) वित्त विभाग, शासन निर्णय क्र.विअप्र २०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम, भाग-२, दि.१७.४.२०१५

**प्रस्तावना :-**

शासन अधिसुचना, गृह विभाग क्रमांक एमसीटी-०८०५/१०६३/१३६/परिवहन-५, दिनांक २५ जुलै, २००६ अन्वये अपघाताच्या बाबतीतील नुकसान भरपाईसाठी ज्यामध्ये मोटार वाहनाच्या वापरामुळे व्यक्तींना मृत्यू किंवा शारिरीक इजा पोहचणे किंवा एखाद्या त्रयस्थ व्यक्तीच्या मालमत्तेस हानी पोहचणे किंवा दोन्हीही बाबतीतील दाव्यांवर अधिनिर्णय देण्याच्या प्रयोजनार्थ राज्यातील जिल्हा व तालुक्याच्या ठिकाणी त्या महसूली परिक्षेत्रासाठी दर्शविण्यात आलेल्या क्षेत्रासाठी मोटार अपघात दावा न्यायाधिकरणाची स्थापना करण्यात आली आहे. तसेच राज्यातील जिल्हा व तालुक्याच्या ठिकाणी पदस्थापित केलेले जिल्हा न्यायाधीश, सह जिल्हा न्यायाधीश व अतिरिक्त जिल्हा न्यायाधीश व तदर्थ (ॲडहॉक) अतिरिक्त जिल्हा न्यायाधीश, त्या दर्जाच्या अधिका-यांशी समतुल्य असलेले सदस्य त्या पदाचा भार वेळोवेळी ग्रहण केल्याचे समजण्यात येणारे जिल्हा न्यायाधीश, सह जिल्हा न्यायाधीश व अतिरिक्त जिल्हा न्यायाधीश व तदर्थ (ॲडहॉक) अतिरिक्त जिल्हा न्यायाधीश यांना त्या महसूली परिक्षेत्रासाठी मोटार अपघात दावा न्यायाधिकरणाची प्रकरणे हाताळण्याचे अधिकार प्रदान करण्यात आलेले आहेत. यानुषंगाने जिल्हा न्यायाधीश-१ व अतिरिक्त सत्र न्यायाधीश, वडगाव मावळ, जिल्हा पुणे यांना मोटार अपघात दावा प्रकरणांच्या प्रयोजनासाठी "कार्यालय प्रमुख" आणि "आहरण व संवितरण अधिकारी" म्हणून घोषित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५ अन्वये तसेच वित्तीय अधिकार, नियम पुस्तिका-१९७८, भाग पहिला, उपविभाग एक मधील अनुक्रमांक ३, नियम क्रमांक २ अन्वये प्रशासकीय विभागांना देण्यात आलेल्या अधिकारानुसार तसेच महाराष्ट्र कोषागार नियम,१९६८ मधील नियम १५ (३) व १५६ अन्वये दिलेल्या अधिकारांचा वापर करून जिल्हा न्यायाधीश-१ व अतिरिक्त सत्र न्यायाधीश, वडगाव मावळ, जिल्हा पुणे यांना मोटार अपघात दावा प्रकरणांच्या प्रयोजनासाठी "कार्यालय प्रमुख" आणि "आहरण व संवितरण अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदर आदेश वित्तीय बाबींपुरतेच मर्यादित राहतील.

०२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०२४०८०७१४४४०४२३२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

MADKAR PRATAP SAMPATRAO

Digitally signed by MADKAR PRATAP SAMPATRAO
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT,
2.5.4.20=691ba5cde50be5ad4d70b5410e666a3f513b4fd3934f0227b3aab4ff49ee9941, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=B6C9D92AA5599BE94C2F37BF0363AAF3D243DE73A6A2F15A0AE751006929371A, cn=MADKAR PRATAP SAMPATRAO
Date: 2024.08.07 14:59:04 +05'30'

**( प्रताप माडकर )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) प्रबंधक, मा.उच्च न्यायालय (अपिलेट शाखा), मुंबई. (पत्राने)
२) प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, पुणे.
३) जिल्हा न्यायाधीश-१ व अतिरिक्त सत्र न्यायाधीश, वडगाव मावळ, जिल्हा पुणे.
४) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
५) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
६) उप कोषागार अधिकारी, वडगाव मावळ, जि. पुणे
७) वित्त विभाग (विनियम/कोषा/व्यय-८), मंत्रालय, मुंबई.
८) निवड नस्ती (परिवहन-५), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.